८ मंडळस्तरावरील विभागीय कार्यशाळा येथे बाहययंत्रणेद्वारे (आऊटसोर्सिंग) घेण्यात येणाऱ्या सुरक्षा रक्षकांच्या सेवेकरीता येणाऱ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.....

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः सुरक्षा-२०२२/ प्र.क्र.११७/ आरोग्य-४**

मंत्रालय, १० वा मजला, संकूल इमारत,

गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.

**दिनांक : १३ एप्रिल, २०२२.**

**वाचा**

१) शासन निर्णय ,उद्योग उर्जा व कामगार विभाग क्र.एमजीए-१५०६/प्र.क्र.९२/काम-५, दि.०८.११.२००६.

२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.२९/१०/वित्तीय सुधारणा-१, दि.०२.०८.२०१६.

३) शासन निर्णय ,उद्योग उर्जा व कामगार विभाग क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-३/उद्योग-४, दि.०१.१२.२०१६.

४) संचालक, आरोग्य सेवा-२, आरोग्य सेवा (परिवहन) पुणे,यांचे पत्र क्र. संआसे-२/कक्ष/परविहन/बाहययंत्रणा/सुरक्षा सेवा/४२७३-७४/२०२२, दि.०३.०३.२०२२.

**प्रस्तावना :**

उपसंचालक, आरोग्य सेवा (परिवहन), पुणे यांच्या अधिनस्त ८ मंडळस्तरावरील विभागीय कार्यशाळा आरोग्य सेवा (परिवहन), पुणे या कार्यालयाच्या सुरक्षेकरीता, तसेच, कार्यालय परिसरात ठेवण्यात आलेली शासकीय वाहने व मालमत्ता यांच्या सुरक्षेसाठी जिल्हा सुरक्षा रक्षक मंडळ, पुणे यांचेकडून सुरक्षा रक्षकांची सेवा उपलब्ध करुन घेण्यासाठी येणाऱ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.यासंदर्भात पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :**

उपसंचालक, आरोग्य सेवा (परिवहन), पुणे यांच्या अधिनस्त ८ मंडळ स्तरावरील विभागीय कार्यशाळा येथे सन २०२२-२३ या कालावधीसाठी विभागीय कार्यशाळेच्या सुरक्षेसाठी जिल्हा सुरक्षा रक्षक मंडळ, पुणे यांचेकडून सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाच्या कालावधी करीता २७ सुरक्षा रक्षकांच्या सेवा घेण्यासाठी येणाऱ्या रु.८१,१६,५२४/- (अक्षरी रुपये एक्कयाऐंशी लक्ष सोळा हजार पाचशे चोवीस फक्त) इतक्या खर्चास पुढीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| Approximate Cost For Security Service for the year २०२२-२०२३ | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| Sr No. | Circle | Office / Work shop | Total Required SecurityGuards / Watchman on considering the area | Approx. Cost per candidate ( रुपये ) | Total Approx. Cost per month ( रुपये ) | Total Approx Cost per Year ( रुपये) |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | Pune | DDHS Transport HQ pune & Divisional Workshop, Pune | ६ | २५०५१ | १५०३०६ | १८०३६७२ |
| २ | Thane | Divisional Workshop | ३ | २५०५१ | ७५१५३ | ९०१८३६ |
| ३ | Nasik | Divisional Workshop | ३ | २५०५१ | ७५१५३ | ९०१८३६ |
| ४ | Kolhapur | Divisional Workshop | ३ | २५०५१ | ७५१५३ | ९०१८३६ |
| ५ | Latur | Divisional Workshop | ३ | २५०५१ | ७५१५३ | ९०१८३६ |
| ६ | Aurangabad | Divisional Workshop | ३ | २५०५१ | ७५१५३ | ९०१८३६ |
| ७ | Akola | Divisional Workshop | ३ | २५०५१ | ७५१५३ | ९०१८३६ |
| ८ | Nagpur | Divisional Workshop | ३ | २५०५१ | ७५१५३ | ९०१८३६ |
| | | | २७ | २००४०८ | ६,७६,३७७ | ८१,१६,५२४/- |

२. बाहययंत्रणेद्वारे (आऊटसोर्सिंग) घेण्यात येणाऱ्या सुरक्षा रक्षकांच्या उपरोक्त तत्क्यात दर्शविण्यात आलेल्या सेवेकरीता पुढील अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

१) बाहययंत्रणेद्वारे काम करुन घेताना शासन निर्णय क्र. शासन निर्णय ,उद्योग उर्जा व कामगार विभाग क्र.एमजीए-१५०६/प्र.क्र.९२/काम-५, दि.०८.११.२००६ मधील तरतुदीनुसार पूर्तता करण्यात यावी.

२) शासनाने मान्यता दिलेल्या सुरक्षा मंडळ अथवा मेस्को यांचेकडून सुरक्षा रक्षक घेण्यास प्रथम प्राधान्य द्यावे. त्यांचेकडून सुरक्षा रक्षक सेवा उपलब्ध न झाल्यास सर्व रुग्णालयांसाठी विहीत पध्दतीने ई- निविदा प्रक्रीया एकाच वेळी व राज्य स्तरावर पार पाडून अत्यंत पारदर्शक पध्दतीने बाहययंत्रणेची निवड करण्यात यावी.

३) सुरक्षा रक्षकांचे वेतन त्यांच्या बँक खात्यात जमा झाल्याची खात्री केल्याशिवाय पुढील महिन्याचे देयक अदा केले जाणार नाही अशी अट Tender document मध्ये समाविष्ट करण्यात यावी.

४) खर्च मंजूर अर्थसंकल्पिय तरतुदीमधून करण्यात यावा.

५) खर्च विहीत पध्दतीने करावा.

६) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. पदनि-२०१३/प्र.क्र.११/१३/विसू-१,दि. २/२/२०१३,क्र.पदनि-२०१३/प्र.क्र.११२/१३/विसू-१,दि.२/१२/२०१३ व दि. १९/१२/२०१३ मधील तसेच, या आदेशात वेळोवेळी केलेल्या सुधारणा/तरतुदींचे पालन करणे आवश्यक राहील.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांक-विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५, अन्वये, वित्तिय अधिकार नियम

पुस्तिका - १९७८ भाग - पहिला, उपविभाग-तीन मधील अ.क्र.४, परिच्छेद क्रमांक २७ (२) अनुसार प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर प्रस्तावावरील खर्च "मागणी क्र.आर-१, २२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६ - सार्वजनिक आरोग्य, ००१ - संचालन व प्रशासन, ४०० - इतर खर्च, (०१)(१०) राज्य आरोग्य परिवहन संघटनेची आस्थापना, (२२१० १०५३) १० - कंत्राटी सेवा" या लेखाशिर्षाखालील सन २०२२-२३ या वित्तिय वर्षाकरीता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानामधून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३०७१३३८०५९११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DEEPAK NIVARTTI KENDRE

Digitally signed by DEEPAK NIVARTTI KENDRE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=40fdba39a26dd429d5be80f9cd76998906ed5012a776fbe5072661d97c2c56c9, pseudonym=BF4C0C742439A64408C0621CD1FF33CD1AD8C6B9, serialNumber=C351F74FB3439ACA71466FCFBB2509C3310AE753E395A89FFA7C6E3887B0AADF, cn=DEEPAK NIVARTTI KENDRE
Date: 2022.04.13 15:08:22 +05'30'

( दीपक नि. केंद्रे )
अवर सचिव महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक,राष्ट्रीय अभियान,आरोग्य भवन,मुंबई
२. संचालक, आरोग्य सेवा-१,आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
३. संचालक, आरोग्य सेवा-२,आरोग्य सेवा संचालनालय, पुणे
४. सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई
५. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ),आरोग्य सेवा, पुणे.
६. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), मुंबई/ पुणे.
७. उपसंचालक, आरोग्य सेवा (परिवहन), पुणे.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/ठाणे/नाशिक/कोल्हापूर/लातूर/औरंगाबाद/ अकोला/नागपूर
९. महालेखापाल १ / २, महाराष्ट्र ( लेखा व लेखापरिक्षा) / लेखा व अनुज्ञेयता, मुंबई/ नागपूर.
१०. विनियम कार्यासन, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. कार्यासन अधिकारी ( अर्थसंकल्प ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
१२. निवडनस्ती ( आरोग्य-४ ).